## आतिथी संपादक

हर्षाली पवार ( मुंबई)

## संपादक मंडळ

सोनाली घाटपांडे (पुणे)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

भारती सरमळकर (मुंबई)

सचिन काकडे (मुंबई)

शशिकांत रणवरे (ठाणे)

## मांडणी व सजावट

Last Bench Designs

## मुखपृष्ठ

विवेक लुपणे

viveklupane@ymail.com

## संपर्क


ई साहित्य प्रतिष्ठान

जी ११०२, ईटर्निटी

मॅरेथान चौक

ठाणे - ४००६००४.

 ९८६९६७४८२०


➦ हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी तसेच सुचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी


✉ **netaksharee@gmail.com**





रसिकहो,

मुक्त ऑन च्या यशानंतर हा अंक आपल्या हाती देताना फार आनंद होत आहे.तुम्ही दिलेल्या उदंड प्रतिसादाबद्द्ल सा-यांचे आभार!!!!मी आपली अखंड ऋणी आहे!!! नाम काका,आनंद दादा,सोनाली दी आणि या अंकात ज्या ज्या कविंनी त्यांच्या कलाकृती विश्वासाने सोपविल्या आहेत त्या सा-यांचे आभार!!!

“बालपण” प्रत्येकाच्या आयुष्यात आलेला सर्वात सुखावह काळ...पण कित्येकांच्या आयुष्यात हेच बालपण काळीकभीन्न रात्र होऊन समोर ठाकुन उभी राहते.आपण मात्र ती रात्र दुरुनच अनुभवत असतो पण किती भीषण नाते!!!

आपल्या मुलांसाठी आपण कपडे,गाड्या,चवीचं खाणं,मोबाईल,ऐशो-आराम,महागडे मॉल्स या आणि अशा अनेक गोष्टींमागे धावत असतो.पण अशीही मुलं आहेत की त्यांच्या डोक्यावर मायेचं छ्त्र नाही,एका वेळेचं जेवणही त्यांना धड मिळत नाही,पायात चप्पलही नसते आणि उन्हात पोटासाठी भुक मागत भट्कत असतात,शाळेतही जायला मिळत नाही..आणि अशी एक आणि कित्येक...!!!

जेव्हा ही मुलं आपल्याकडे काही मागायला येतात “चल,घाणेरडा..कुछ नही मिलेगा..भाग यहासे” असं म्हणून पिटाळुन लावतो.पण कधी विचार केलाय की आपलं स्वतःच मुल या जागी असेल तर काय वाटेल?? आपण त्यांना काही देत नाही मग ही अशी वागणूक तरी का देतो???काहिच हक्क नसतो कुणालाही त्यांच्याशी तसं वागण्याचा..पण तरीही आपण वागतोच तसे..

भरपूर वेळा असं होतं की तुम्ही तुमच्या मुलांसाठी करतंच रहाता..पण त्यांना वेळच देत नाही,उमलत्या वयात त्यांच्यावर जे संस्कार व्हायला हवे असतात ते मग नकारात्मक विचारात बदलतात.. अशा मुलांच्या स्वभावात एक गडद पोकळी निर्माण होते..

हा माझा अंक अशा सगळ्या फुलांसाठी ज्यांचं बालपण उमलण्याआधीच सुकुन गेलंय..आणि त्याचं यश मला तेव्हाच मिळेल जेव्हा हे वाचल्यानंतर काहीनाही तर कमीतकमी अशा छोट्यांशी सारेजण प्रेमाने वागाल.एखाद्या आई-बाबांनी आपल्या मुलावर दडपण आणलं असेल तर त्याची जाणिव होऊन ते कमी कराल,तुमच्या सोनुल्यासोबत एखाद्या रविवारी छान खेळाल,होटेलात लादी पुसणा-या, तुमच्या बुटांची पॉलीश करणारा किशोर त्याला कमीत कमी थॅंक्स म्हणाल,तुमच्यासाठी हातात काटेरी फुलं घेऊन विकणारी मुलं त्यातलं एक फूल त्यांना हातभार म्हणून तरी घ्याल.आपण समाजाचं देणं लागतो,आणि त्याच समाजात ही चिमुरडीही आहेत..

विचार करा आणि अमलात आणा..आणखी काय सांगावे..

माझ्या या कवितेत मी अनाथ मुलाची व्यथा मांडली आहे.आई-बाबा लहानपणीच वारले आहेत.स्वतःच शिकतो(मुलगा),स्वतःच कमवतो(बाबा),आणि घर(ज्यात तो फक्त एकटाच आहे) तेही सांभाळतो(आई).सगळ्या भुमीका पार पाडताना रडकुंडीला आलाय.पण आई बाबांच्या तस्वीरीकडे पाहून सारं काही करत राहतो.त्याने त्याच्या आई बाबांना लिहीलेलं पत्र.!!!

प्रिय आई-बाबा ,

एक खोल गडद पोकळी

भरुन गेलीय स्वतःत,

आई-बाबा तुम्ही कालही

नाही आलात स्वप्नात..

शाळेत जाताना मित्रांचे

आईच्या हातात हात,

माझे मात्र हात

गुलबाच्या काटेरी रिंगणात..

शाळेतला माझा पहिला नंबर

पण बाबा नाही कौतुक करायला,

रिझल्ट फोटोसमोर तुमच्या

प्रेमळ हात नाही कुरवाळयला...

रस्त्यात मी विकलेली फुलं,

गाड्यांच्या गर्दीत चुकलेला ठोका

मीच भिरकावुन दिलेला,

माझ्या बालपणाचा झोका..

धुळधाण मी लोकांच्या पायाची,

माझं मन जाळलेलं मी स्वतःच

तुमच्या पायांची धुळ झालो असतो,

तुम्ही सोडली साथ सुरुवातिलाच...

माझा फक्त मीच असतो,

अभ्यास दिव्याखाली अंधारलेल्या

रात्र आयुष्याची गर्द होतेय

भासत राहतात मग तुमच्याच सावल्या...

मी यशाची वाट चालतो,

एकटाच अंधारलेली

उमलत्या या फुलाची साथ,

पोरकेपणानंच सांधलेली...

सारी नाती मीच माझी,

नाही पाणी,नाही ओलावा

बिज तुमचं अंकुरतंय

पोरका रस्ता,पोरका वारा...!!!

**-हर्षाली पवार**

आपण त्या कोवळ्या जिवांना पाहतो...ती कशी जगत असतील याचा विचार करतो..पण या विचारापलीकडे आपण जातंच नाही...कारण आपल्यालाही त्यांना तसं पहाण्याची सवय झालेली असते..ही एक आपल्या विचारांपलीकडे जाऊन विचार करायला,तो अंमलात आणायला लावणारी कविता...

## *सवय*

*कळ्या कुस्करलेल्या पहायची*
*किती सवय होते!!,*
*चांदण्या जळताना बघायची*
*किती सवय होते!!*

*आमच्या घरात देखील असतात*
*गोजिरवाण्या बाहुल्या,*
*लोकांच्या बाहुल्या मातीत पहायची*
*किती सवय होते!!*

*फटाक्याच्या कारखान्यात,*
*श्रीमंतांच्या घरात,*
*रस्त्यारस्त्यात बालमजूर बघायची*
*किती सवय होते! !*

असेल त्यांचं कर्म खोटं,
असेल कदाचित नशीब थिटं,
तरी मदतीचा विचार न करण्याची
किती सवय होते!!

करुया का विचार थोडा?
देऊया का वेळ थोडा?
विद्ध पाखरांना नभ दाखवायला
मन फुलून येईल......
मग ह्याचीच सवय होईल!!!!!


-प्रभा प्रभुदेसाई

prabhapd@gmail.com

खरंच आपल्याला कळतंच नाही...आपण फक्त हुदद्याने आणि संपत्तीने मोठे होतो पण मन मात्र तसंच संकुचीत...आपल्या कक्षेबाहेर जाऊन विचारंच करायला जमत नाही...नाही नाही आपल्याला तो करायचाच नसतो...मग आपल्याला हे तरी कसं समजणार...

## *नागवं भवितव्य.....*

दिवस उजाडताना,
प्रकाशात बुडून जाणा-या..
स्वप्नांच्या चांदण्या अगणित..
डोक्यावरचा सूर्य पेटताना
हातावरच्या पोटात..
उसळणारा भुकेचा आगडोंब अगतिक
ज्या खांबाखाली सारा दिवस जातो
त्याच्या तारेवर भरणारी
चिमण्यांची शाळा दुपारची...
पावसापाण्यात छप्पर शोधताना
बंगल्यांच्या कुलुपबंद गेटआतून
भुंकणारे विदेशी कुत्रे राजेशाही
भोवती दाटून येणा-या काळोखात
सरकारी काजव्यांचा आधार तात्पुरता
संध्याकाळी थकून भागून
रस्त्याच्या कडेला फुटपाथवर झोपणारं
उद्याच्या उज्वल राष्ट्राचं भवितव्य नागवं



-गजानन मुळे

mulegajanan57@gmail.com

बीज अंकुरे अंकुरे

पत्त्यांचा बंगला बांधायच्या वयात लोकांची घरं बांधणारा छोटा....अशी कित्येक मुलं आपण पहातो ना...कदाचित आपल्याचमधल्या कितीतरी जणांनी आपली घरं बांधतानाही पाहिली असतील असली मुलं...पण त्यावेळी कधी विचार केलाय कि त्या चिमण्या बाल्मजुरावर काय कोसळत असेल...तुमची घरं बांधताना...

## बालमजूर

सुखाचे सुरम्य निमीष जळाले,
करुनी लबाडी शिशुत्व पळाले.

बघुनी अपेष्टा उपाशी घराच्या,
लहान्या पदांचे रस्तेही वळाले.

भुकेल्या जिवाची दया ना कुणाला,
हरामी जगाचे इरादे कळाले.

शिकाया धजावे कसे ते कळेना,
रिकाम्या खिशातुन दैवच गळाले.

पुसावे इश्वरा गुन्हा काय माझा,
विवश तो, तयाचे इशारे मिळाले.

न आता भिती अन न आशा कुणाची,
लिहीली हलाखी नशीबी कळाले

.



-सचिन पावसकर skpawaskar@gmail.com

काय समजत असतं हो या लेकरांना??? फक्त पोट भरण्यासाठी सगळं करायचं एवढंच...!!!पण ती खळगी भरण्यासाठी जे करावं लागतं त्याची जखम त्यांच्या मनावर चांगलीच उमटत असते..मग ते कोवळं मन प्रौढासारखं विचार करु लागतं पापाचा...पुण्याचा....समजत नसलं तरीही...

## काय मी पाप केले....

देवा,काय पाप मी केले
फुलण्याआधी
बीजच तु का रे
असे खुडले....!!

पुण्य काय ते
काय ते संचित
भोगणे तेच रोज
वय हो कळण्या पलिकडले....!!

पोटात भुकेची आग
स्वप्नांत येई जाग
कुणी ना देई काही म्हणुनी
भीक मागण्या कळले....!!

रोज सकाळी उठूनी
कागद गोळा करणॅ
शब्द जरी दिसले
कधी मला न ते कळले....!!

बीज अंकुरे अंकुरे

देव ताटलीत घेउनी
मुखी माय माय म्हणोनी
साथ माय ही धावे
जगण्याने मजबुर केले....!!

हात ज्ञानियांचा द्या हो
देवा मागणॅ एक पायी
कुणी माय होईल का
प्रेमास नेत्र ही भुकेले.....!!




-अरविंद बुधकर

arvind_budhkar@yahoo.co.in


बीज अंकुरे अंकुरे

कोवळी मनं..आजुबाजुच्या परिस्थीतीवरुनच त्यांची मनं घडत असतात....त्यांना वेगवेगळ्या सवयी जडत असतात...तसंच एक निर्ढावलेलं पण खरंच कोवळं मन..

## उगीच शान्पट्टी नाय चालायची..

भंकस करायची नाय
बोलेतो तुमच्यात आनि माझ्यात
लै फरक हाय
मैं है बारा वर्षांचा
तुमी तीस,चाळीस,साठीचं असाल
रोज मी सिगारेट्ची पाच पाकिटं संपवतो
हे ऐकुन काय हसाल??

रातच्याला पेगबी घेतो
नशा चढंस्तवर पेतो..
निपचित पडून -हायल्यावर
मागनं मालक येतो..
एक वाजतोय झोपताझोपता
सकाळ माजी हुती चार वाजता
होटेलातली टेबलं खुर्ची लावायची
इडली डोशाची चटनी वाटायची
दंड अशे भरुन येत्यात राव
भंकस न्हाय करायची

बीज अंकुरे अंकुरे

च्यामायला दिसभर
भजी-वड्याचे तुकडे,खरकटी साफ करायची
कदी कचरा काडताना
गि-हायकाला झाडू लागला तर
त्याचीबी थप्पड खायची
सायेब..!!उगीच शान्पट्टी नाय चालायची
तुमी आज येताय राव डोसा खायला
फेमीलीरुममदी बसुन मेड्मचा गालगुच्चा घ्यायला
शिकत का नाहीस रे??
इचारुन फुकाचा ग्रेट्नेस तुमी दावनार
तिकडून सरकार अल्पवय कामगार
करत चुना लावनार
आमचा मालक तरी बरा रं तुमच्यापरास
दिवस-रात काम करुन घेतो तरी
मनीऑर्डर तरी पाठ्वतो घरास
सायेब....ही कामं न्हाईत खायची
म्हनून इचारतो
काय करनार तुमी आमच्यासारख्यांची???
न्हाई न्हवं,मग गप भजी खायची
आन,घरची वाट धरायची
पायजेल तर मी देतो बिल
पर फुकट भंकस नाय करायची!!!


-प्रद्युम्न संतु

बीज
अंकुरे
अंकुरे

मुंबईत पळून येवून उदर निर्वाह किंवा पैसा कमविण्यासाठी येतात. पालक मुलांनी शिकावे म्हणून रागावून मारतात परंतु पौगंड अवस्थेतील मुले डोक्यात राग घालून घर सोडतात. काही परत जातात काही बराच कालावधी मुंबईत राहतात. अशाच एका मुलाची व्यथा....

## टपरीवरचा कांचा

जाहलो एकदा, आठवीत नापास
चोपला बापाने, काठीने खास
लागला मनी , एकच ध्यास
जायची पळून , लागली आस {१}

रस्ता पुढचा, अगदी बिकट
घुसलो रेल्वेत, विना तिकीट
दत्त समजुनी, टी सी शी भेट
घेतली मागूनी, १००ची नोट {२}

सोडीला होता, रात्रीत गाव
मुंबई डोक्यात, कमवायचे नाव
उतरलो, भटकलो, उदरी वडापाव
खाली पुलाच्या, झोपलो राव {३}

भेटले समदुखी, माझ्यासम मित्र
रातची मुंबई, भयंकर चित्र
गल्लीतील भाई, वागे विचित्र
प्यायला संगे, पोलीस मित्र {४}

मुकलो घराची, श्रीखंड पुरी
हाथापाया पडोनी, मिळविली नोकरी
इमाने इतबारे, इथली चाकरी
नेत्याची म्हणे, चायनिस टपरी {५}

गुंडाचा असतो, रातीला धुडगूस
फुकटचा लोलीपोप, पोलीस खुश
राह्यला नाही, कुणावरीच  रोष
करू कुठे अन कसा आक्रोश {६}

म्हणता म्हणता, वर्षे सरली
पाठीवरले व्रण, ना उरली
पाडव्याला मायची,  सय जाहली
असेलच रडत, माय  माउली {७}

चुकले होते,  खरेच माझे
झेपले नव्हते, गणिताचे ओझे
वाटतो मनोमन, खरच पश्चाताप
सगळ्यांचे असतात, का हो रागीट बाप? {८}



**- गजानन लोखंडे**

**gaja.lokhande@gmail.com**

कोलांट्या उड्या मारणारे,आगीच्या रिंगणातुन बाहेर येउन दाखवणारे,उंचच उंच दोरीवर हेलकावे खात तोल सावरणारे डोंबारी पाहिले कि कित्ती कौतुक वाटतं ना..पण ती पोर जेव्हा हिंदकळत असते दोरीवर,स्वतःच्या जीवाशी खेळत सगळ्यांचं मनोरंजन करत असते..तेव्हा तिच्या हरेक हेलकाव्यासोबत आपल्या हृदयाचा एक ठोका तर नक्कीच चुकवते.तिचं मन आपल्याला समजेल का??

## *डोंबा-याची पोर*

मायेहातची ढोलकी ढमाढ्म वाजे
पायी चाळ बांधुन ही रस्त्यावर नाचे
बाप खांब ठोकून तो बांधतोय दोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर

सरसर दोरावर चढे जशी खार
तोल सावराया घेते काडीचा आधार
इवलीशी चिमुरडी किती बिनघोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर

सावळी विठाई रुप आखीव्रेखीव
सावरते तोल तसा गोळा होतो जीव
लकालका हलतोय काळजाचा दोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर

झराझरा इकडुन तिकडे चालली
विजेवानी चमकुन पोर खाली आली
फाटका झगा पसरी लोकांच्या समोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर

खेळ बघणारे आले रिकाम्या खिशांनी
दाम मागताच हात वर केले त्यांनी
कुणीतरी फेकला शिळाच चतकोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर

कुणा माऊलीला आली कणव जराशी
दिलं जुनं पटकूर,लावाया अंगाशी
तेवढ्यानं उजळली जशी चंद्रकोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर

कशाचं शिक्षण,कुठं शाळा तिच्यासाठी
खेळ करी आयुष्याच्या दोन घासांसाठी
नशिबात अधांतर,नियती कठोर
अधांतरी चालतेय डोंबा-याची पोर



- क्रांती सडेकर

krantisadekar@gmail.com

ज्या लहानग्यांची आयुष्यं फुट्पाथवरच फुलत आहेत...वाढत आहेत...ती आपल्या नेहमीच्या सवयीतली मुलं....जी जवळ आली तरी आपण नाकाला रुमाल लावतो किंवा ती पाया पडायला लागली तर "ए हात लावु नको घाणेरडी कुठली!!!" असं म्हणून त्यांची अवहेलना करतो...पण त्यांनाही मनं असतात आणि आपल्या वागण्याने ते प्रत्येक बालमन कुस्करलं जातं....आपल्याला कळत नाही म्हणून की काय त्या सजीव मनाच्या फुटपाथला कळलेली त्यांची मनं त्याच्याच शब्दांत.....!!!

## फुटपाथ

होय!! मी फुट्पाथ आहे..

रस्त्याच्या बाजुला असलेला...

कायम सगळ्यांनी दुर्लक्षीलेला...

आता सिग्नल पडेल

आणि ती गजरा हातात असलेली

केसांना तेल नसलेली मुलगी

प्रत्येक गाडीजवळ जाऊन

"घ्या ना ओ साहेब...ऽऽ घ्या ना ओ साहेब म्हणेल.."

तो फाटक्या बनियानीतला पोरगा

झपाझप गाड्या पुसत सुटेल..

कडेवर बाळ घेतलेली मळकट चेह-याची ती

दिनवाण्या हावभावासह भिक मागेल.. .

बीज अंकुरे

नाक्यावर पॉलीशसाठी बसलेला तो किशोर..

खुप मेहनती आहे तो..

चहा देणारा सलीम

झाडुवाला रतन...

माझ्या अंगाखांद्यावर वाढ्लेत सगळे..

खरं सांगु??

यातल्या प्रत्येकालाच वाटतं खूप शिकावं..

चांगलं खावं-प्यावं अन ल्यावं...

ऑफिसमधून येताना त्यांच्यासाठीही पप्पांनी चॉकलेट आणावं...

मम्मीचं बोट धरुन शाळेत जाणारी मुलं पाहिली ना..

कि यातले कित्येक रडतात..

पण पोट.

त्याचाचसाठी तर ही लाचार झालीत...

काही वर्षं उलटतील...

मग ती भिक मागणारी,गजरेवाली

भड्क पोषाख करुन

पावडर लाली लावुन

बीज अंकुरे अंकुरे

निर्मिती अक्षरा

माझ्यावर उभं राहुन

गि-हाईक हेरतील..

आणि झाडुवाला चहावाला

माझ्यावरचं बसुन नशापाणी करतील

काहीजण चो-यामा-या करतील...दादा होतील..

आणि पोलिसांच्या वा स्वतःसारख्यांनाच गोळ्यांनी संपवतील....

वेदना होतात हो...

कदाचित मी माणुस नाही म्हणुनही होत असतील...

होय मी फुट्पाथ आहे

रस्त्याच्या बाजूला पडलेला अन सगळ्यांनी दुर्लक्षिलेला...



**-महेंद्र कांबळे**

**mahendra.noble@gmail.com**

बीज अंकुरे अंकुरे

बालपण म्हट्ल्यावर शाळाच येते डोळ्यापुढे पहिली...काही काही वेळा परिस्थिती..काही वेळा रुढी-परंपरा,आणि काहि वेळा शिक्षणाबद्दलचं नैराश्य यामुळे मुलं शाळेत जाऊ शकत नाहीत...त्यातल्यात्यात मुलगी असेल तर मग सगळ्याच गोष्टी मारक ठरतात....तिलाही शिकायचं असतं पण...तिच्या कोवळ्या मनावर कित्ती कित्ती दडपण येतं...त्यातुन निघालेला हा आक्रोश पण तिची पुन्हा झालेली कुचंबणा...

***म्या पन साळंला जानार...***

आजंच म्या ठरवलंय

म्या पन साळंला जानार..

माज्या भावावानी...

म्या पन मोट्ठी होनार..

म्या गावातल्या पोरींसगती

म्या बी दिसभर खेळनार..

नको तो खटारा सदीनाचा भांड्याचा

आज म्या बिगी-बिगी सावरनार..

ए आये...आज मी दादावानी साळंला जानार

अगं कारटे!!!

साळंला जाऊन कुनाचं भलं हुनार???

मी शेताला चाल्ली. .

बीज अंकुरे अंकुरे

मग पिठलं-भाकर कोन बनवनार??

म्या भायर पन बघाचं..अन घरी पन..!!

काय साळंला जायाच न्हाय..

बस गुमान हिथंच!!

आयी बापानं मला

जाऊच दिलं न्हाय..

पन म्या आज साळंला जानार!!

साळंला जायचं सपान माजं

सपानच हारवुन गेलं...

तेच कायमचं धुनं

पुन्हा माज्याच नशीबी आलं



-ओंकार तोरसकर

omkar.pt@gmail.com

बीज अंकुरे अंकुरे

परिस्थीतीमुळे तो शाळेत जाऊ शकत नाही पण जाण्याची जिद्द मात्र आहे...शाळेत जाण्याची काहितरी करुन दाखवण्याची,इतरांनाही शिकवण्याची...राख आहे समोर पण त्यातुनही यशाचा महाल बांधण्याची...पण त्या लहानवयाचीही व्यथा आहे

हातात वाटरबॅग पाठीवर दप्तर घेऊन एकदा तरी शाळेत जायचंय..
साहेबांच्या पोरासारखं स्वच्छ गणवेष अन बुट घालुन तयार व्हायचंय..
परिक्षेत चांगले मार्क मिळवुन खूप-खूप टाळ्या ऐकायच्या आहेत..
शिक्षकांना प्रश्न विचारुन विचारुन खूप तंग करायचंय..
मला पण शिकायचंय..

लहान नातवंडांना einstein gaalilioच्या गोष्टी ऐकवायच्या आहेत..
आईला ग्रहणाची खरी कारणं सांगायची आहेत..
भावाच्या enginneeringची feesभरता भरता
मला पण b.com करायचंय..
मला अब्दूल कलाम व्हायचंय..
मला पण शिकायचंय.
रात्रीचा दिवस करुन आंबेडकर बनायचंय..
भरपूर शिकुन टाटा बिर्ला बनायचं. ..

बीज
अंकुरे
अंकुरे

पूर्ण जग फिरायचंय...

मला या चाळीतून बाहेर पडायचंय..

मला पण शिकायचंय..

मी शिकलो कि चाळीला शिकवायचंय...

चाळीसोबत देशाला घडवायचंय..

पैशासाठी नव्हे तर देशासाठी वोट द्यायचंय..

मला भारताचा ओबामा व्हायचंय..

मला पण शिकायचंय..

साहेबांच्या आवाजाने जाग आली..

अन कळलं अजून गाडी धुवायची आहे..

आतून मालकीण म्हणाल्या आज पिठ दळायचंय..

साहेबांच्या पोराला शाळेला सोडायचंय..

पण मला पण शिकायचंय...

गाडी पुसता-पुसता गाडीचा मालक व्हायचंय..

मला पण शिकायचंय..

-मोहित कालानी

mohitkalani@gmail.com

बीज अंकुरे अंकुरे

ती आणि तिचं ते हळवं बालपण.....काळासोबत कधीच वाहत गेलेलं...!!!! भातुकलीचा खेळ खेळायच्या वयात खराखुरा मांडलेला संसार खरंतर संसार कशाशी खातात हे सुद्धा ठाऊक नसलेल्या वयात लेकुरवाळी झालेली ती...तिच्या हरवलेल्या बालपणाला न्याहाळतेय....या कवितेत बालपणाच्या व्याख्येतला फरकही आहे..आणि आजच्या पिढीचं बालपण हरवत चाललंय ही खंतही!!

***बालपणाच्या आठवणीत***

मला समजलेच नाही,

माझे बालपण कधी सरले ते!!!

कारण लहान वयातच माझ्या आई-बाबांनी

माझे लग्न लावुन दिलेले...

त्या वेळीस मला लग्नाचा

अर्थही कळत नव्हता...

पण परिस्थितीपुढे

नाईलाज होता...

भातुकलीचा खेळ ख-या

आयुष्याचा भाग बनला

बाहुला-बाहुलीचं आणि

खरंखुरं लग्नयातला फरक समजला...

लहानपणीची दंगा-मस्ती

मी नाही कधी अनुभवली...

मग संसार हेच माझं बालपण
स्वयंपाकघर हीच माझी नवी भातुकली...
पुढे सासरकड्ची माणसं
आणि माझी मुलं...
यातच मी रमले, अड्कत गेले..
आता माझा सगळा वेळ त्यांचाच
आणि हळुहळू बालपणही संपले होते..
माझे संपुर्ण जीवनआता त्यांचेच होते...
मी सुद्धा जेव्हा माझ्यानातवंडांना पाहते..
त्यांचे बालपण निरखते...
असे वाटते..खूप काही मागे राहिले....
मलाही वाटते..पुन्हा एकदा लहानगे व्हावे
पुन्हा आई-वडिल,आजी-आजोबांकडे पोरकळ हट्ट करावे..
लपाछ्पीचे ते खेळ पुन्हा नव्याने खेळावे..
बालमैत्रीणींसोबत पुन्हा झोक्यावर बसावे...
पुन्हा बाहुला बाहुलीचे लग्न,
आणि भातुकलीचा खेळ मांडावा
पुन्हा झाडावर चढुन,
कै-या,पेरु चिंचा खाव्या...!!

सारे हरवलेले बालपण,

पुन्हा जगून घ्यावे.

जमलेच तर भावासोबत,

शाळेत जाऊन शिकावे.

आज जेव्हा या मुलांना पाहते

कम्प्युटर आणि टी.वी वर खेळताना

आणि सतत अभ्यासाला जुंपताना

मनात एकच विचार येतो

माझे बालपण मला जगता नाही आले..

माझे फुल उमलायच्या

आधीच खुड्ले..

पण यांच्या बालपणाचं काय??

ते तर त्यांच्यापासून

लांब पळतंय.....!!!

कदाचित कायमचं हरवतंय....!!!!



**-प्रियांका देशपांडे...**

deshpriyanka@gmail.com

# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षापूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेल ई-स्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??

फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.



esahity@gmail.com

खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

:अधिक माहितीसाठी :

संकेत स्थळ



www.esahity.com

फेसबुक



https://www.facebook.com/esahity

धन्यवाद !!